सन २०१८-१९ मधील अर्थसंकल्पीत
तरतूदीचे वितरण करणेबाबत.
राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतगत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी अर्थसहाय्य (२४२५२५२४)

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.अर्थसं २०१८/ प्र.क्र.९३/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०१९

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक सीसीआर १४०६/प्र.क्र.२४७/२-स, दिनांक १७/०५/२००६

२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक सीसीआर १४०६/प्र.क्र.२४७/२-स, दिनांक ०५/०९/२०१४

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८

४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं २०१८/प्र.क्र.९३/२-स, दिनांक ०४/०६/२०१८

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५/०१/२०१९

६. सहकार आयुक्त व निबंधक यांचे पत्र क्र.सआ-६/अंवनि/format A/१८-१९/२०१९, दिनांक २५/०१/२०१९

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा क्र.२ शासन निर्णय दिनांक ०५/०९/२०१४ नुसार शासनामार्फत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना १.७५% व १.२५% दराने देण्यात येणाऱ्या व्याज परताव्याच्या धोरणात अंशत: बदल करून राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना १.५% वाढीव १% असा एकूण २.५% दराने व्याज परतावा प्रत्येक वर्षी मंजूर करण्यात येतो. हे अर्थसहाय्य सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून करण्यात येणाऱ्या पीक कर्ज वाटपावर अदा करण्यात येते.

राज्य शासनाच्या धोरणास अनुसरून सन २०१८-१९ या वर्षीही जिल्हा मध्यवर्ती बँकांमार्फत शेतकऱ्यांना दिलेले पीक कर्ज ६% व्याज दराने उपलब्ध होण्यासाठी राज्य शासनाकडून २.५% व्याज परताव्याची रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. **शासन निर्णय :-**

राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी अर्थसहाय्य योजनेअंतर्गत सन २०१८-१९ वर्षात अर्थसंकल्पीत रू.२०००.०० लाख तरतूदीपैकी रू.१४००.०० लाख एवढ्या निधीचे वितरण करून खर्च करण्यास वाचा मधील ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आता रू.२००.०० लाख (रू.२.०० कोटी) निधीस वितरण करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५/०१/२०१९ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ८०% वितरीत करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८ च्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते ९ पैकी परिच्छेद ७ (१) (अ) वगळता इतर सर्व परिच्छेद या योजनेस लागू नाहीत. तसेच या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत आहे.

४. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा-५, दि.१०/०५/२०१६ मधील परिच्छेद "ब" मधील २ नुसार तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १, ते ७ या योजनेस लागू नाहीत. अ.क्र. ८ येथील तपासणी सूचीतील बाबींची पूर्तता होत आहे.

६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. ३ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८ मधील परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

*(१)* **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५/०१/२०१९ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ८०% वितरीत करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

*(२)* **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी रूपये २०००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत झालेला आहे.

*(३)* **यास्तव** मागील ३ महिन्यापूर्वी ७०% निधी (रूपये १४००.०० लाख) वाटप करण्यात आलेले आहे. तसेच सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्रदेखील मागविण्यात आले आहे.ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.

*(४)* स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

*(५)* वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- या योजनेअंतर्गत वैयक्तिक लाभार्थी नाहीत. प्राथमिक कृषी पतपुरवठा संस्था ह्या लाभार्थी आहेत.

*(६)* बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

*(७)* खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

*(८)* साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

८. सदर तरतूद संबंधित बँकांना अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधीन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

९. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (००) (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) (१६) राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी अर्थसहाय्य (२४२५२५२४) ३३ अर्थसहाय्य (दत्तमत) ", या लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २५/०१/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२२११४५५२२७९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2019.02.21 14:57:13 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

अवर सचिव तथा सहनिबंधक सहकारी संस्था

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र - १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र - २, नागपूर.
४. निमंत्रक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, पुणे.
५. प्रशासक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई.
६. कार्यकारी संचालक, सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका.
७. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
८. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई
१०. कोषागार अधिकारी, पुणे.
११. निवड नस्ती-१८-स.